**महासमादेशकांचे कार्यालय, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील उप महासमादेशक या अस्थायी पदास मुदतवाढ मिळणेबाबत.**
दिनांक १/१०/२०१८ ते दि.२८/२/२०१९

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एचजीएस-२०१८/प्र.क्र.०२/विशा-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २५ ऑक्टोबर, २०१८

वाचा:- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि-२०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दिनांक ०७/०९/२०१८
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. एचजीएस २०१८/प्र.क्र. ०२/विशा-८, दि. १८/०५/२०१८
३) महासमादेशकांचे कार्यालय, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. मस/कार्या-२/अस्थायी/२०१८/२८६२, दिनांक १४/०९/२०१८

**प्रस्तावना :**

महासमादेशकांचे कार्यालय, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील उप महासमादेशक या अस्थायी पदास दि. ०१/०३/२०१८ ते दि. ३०/०९/२०१८ पर्यंत संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णय दि. १८/५/२०१८ अन्वये मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदतवाढ दि. ३०/९/२०१८ रोजी संपली आहे. वित्त विभाग दिनांक ७ सप्टेंबर,२०१८ च्या शासन निर्णयान्वये आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१/१०/२०१८ ते दि. २८/२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना देण्यात आले आहेत. तसेच दि. ३०.०९.२०१८ पूर्वी कोणत्याही परिस्थितीत कार्यालयांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेऊन, सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. त्याअनुषंगाने सुधारित आकृतिबंधाचा प्रस्ताव वित्त विभागास दिनांक २९/८/२०१८ रोजी सादर केलेला आहे. यास्तव महासमादेशकांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयातील उप महासमादेशक या अस्थायी पदास दिनांक ०१/१०/२०१८ ते दि. २८/२/२०१९ पर्यंत पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

महासमादेशकांचे कार्यालय, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयातील उप महासमादेशक वेतनश्रेणी (रुपये ६७,०००-७९,०००+ HAG ) Pay Matrix level १५ (७ th Pay commission) या अस्थायी पदास दिनांक ०१/१०/२०१८ ते दि. २८/२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. या पदांवर होणारा खर्च मागणी क्र.१ मुख्य लेखा शिर्ष "२०७०-इतर प्रशासनिक सेवा (१०७) होमगार्ड ०१ वेतन" या लेखाशिर्षाखाली वर्ग करण्यात यावा व सदरचा खर्च वित्तीय वर्षासाठी मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातुन भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र. ८/१६ आ.पु.क., दिनांक ७ सप्टेंबर, २०१८ अन्वये अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांचा संकेताक क्र. २०१८१०२६१५४२४१४८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Deepak Vasant Sawant

Digitally signed by Deepak Vasant Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=43cdfecb6fd26ff7b1b970520962ebf72d86546b92151214820b2bb31f3ccac8, serialNumber=66ea8e25496abe127ddbfd3157e10ae5a1fb12e738b63f8a5b2cb92885fd1f05, cn=Deepak Vasant Sawant
Date: 2018.10.26 15:48:46 +05'30'

( दि. व. सावंत )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत माहिती तथा योग्य त्या कार्यवाहीस्तव अग्रेषित :**

१) महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६) वित्त विभाग, आ.पु.क., मंत्रालय,मुंबई.
७) निवड नस्ती, विशा-८ कार्यासन, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.